**महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या शासन अंगीकृत उपक्रमास सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात केंद्र शासन पुरस्कृत योजनेसाठी राज्य शासनाच्या हिस्साची रक्कम अदा करण्याकरीता सहायक अनुदान मंजूर करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: टीडीसी-२०१४/६/प्र.क्र.३४९/पर्यटन,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- १ डिसेंबर, २०१४.

**शासन निर्णय :** सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई या शासन अंगीकृत उपक्रमास केंद्र शासन पुरस्कृत योजनेसाठी राज्य शासनाचा हिस्सा या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई या शासन अंगीकृत उपक्रमास सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता रुपये १०.०० कोटी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यापैकी रुपये ५.४० कोटी (रुपये पाच कोटी चाळीस लाख फक्त) "केंद्र शासन पुरस्कृत योजनेतील राज्य शासनाचा हिस्सा" या लेखाशिर्षाखाली महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास खालील कामांना वितरीत करण्यास शासन या आदेशान्वये मंजूरी देत आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | केंद्राकडून मंजूर निधी | राज्यशासनाचा वाटा | सन २०१४-१५ मध्ये वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नाशिक (गंगापूर डॅम नाशिक शहर) येथे स्थळ विकास, गोवर्धन येथे कलाग्राम (नाशिक शहर आणि गोंदेश्वर) येथे मेगा प्रोजेक्ट | २४.८९ | ११.७९ | ३.५५ |
| २ | औरंगाबाद येथे मेगा सर्कीटचा विकास | २३.४३ | १६.३१ | १.०० |
| ३ | धापेवाडा / पराडसिंगा निसर्ग पर्यटन विकास व धापेवाडा पर्यटन केंद्र | ७.८० | ४.१९ | ०.३५ |
| ४ | भंडारा, गोंदिया,नागपूर निसर्ग पर्यटन मेगा सर्किट | ४५.३२ | १२.५५ | ०.५० |
| | **एकूण** | **१०१.४४** | **४४.८४** | **५.४०** |

२. केंद्र शासन पुरस्कृत योजनेसाठी राज्य शासनाचा वाटा यासाठी सन २०१४-१५ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेली रुपये १०.०० कोटी पैकी रुपये ५.४० कोटी (रुपये पाच कोटी चाळीस लाख फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांना अदा करण्यास शासन खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूरी देत आहे.

**३. अटी व शर्ती :**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१५ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६) उपरोक्त सर्व कामांना तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

९) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत

प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच सदरची कामे पूर्ण झाल्यानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ / जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील, अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११) सदर कामे पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

१२) सदर कामाची अंदाजपत्रके व आराखडे शासनास सादर करावीत.

१३) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१३-१४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "मागणी क्रमांक झेड्डी-४, ३४५२-पर्यटन,०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (०१) केंद्र पुरस्कृत योजनेतील राज्य शासनाचा हिस्सा (३४५२ १९०२) ३१, सहायक अनुदान" (वेतनेत्तर) या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. आ. बा. डमाळे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. ब.गु. सैदानवरु, उप सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक म्हणून घोषित करण्यात आले आहेत. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून "महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित" (MAHARASHTRA TOURISM DEVELOPMENT CORPORATION LTD., MUMBAI) या नावावर धनादेशाद्वारे काढून संबंधितांना वितरीत करावयाची कार्यवाही करावी.

१४) हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सल्ल्याने व सहमतीने नियोजन विभाग अनोपचारिक संदर्भ क्र. २१ / १४४४ दिनांक १७/१/२०१४ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १७३/व्यय-१४ दिनांक ११/२/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१४१२०११३४०१२३०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashruba Baburao Damale

Digitally signed by Ashruba Baburao Damale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TCA, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Ashruba Baburao Damale
Date: 2014.12.01 17:26:15 +05'30'

**( आ.बा.डमाळे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

३) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.

८) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.

९) अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, (अर्थसंकल्प शाख), मंत्रालय, मुंबई.

१०) निवड नस्ती.